शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, जालना
या नवनिर्मित महाविद्यालयाकरीता इमारत
भाडयाने घेण्यास मंजूरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः इभाडे-०६२४/प्र.क्र.२३६/प्रशा-२**
गो.ते. रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१
तारीख: २५ जून, २०२४

वाचा :-

१. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दिनांक १७.०४.२०१५
२. शासन निर्णय वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्रमांकः एमईडी-२०२२/प्र.क्र.२२९/शिक्षण-१, दिनांक १४.०७.२०२३
३. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय यांचे पत्र क्र. डीएमईआर-१२०११/५/२०२३-ईडीयु, दिनांक ०५.०४.२०२४.
४. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय यांचे पत्र क्र. डीएमईआर-१२०११/५/२०२३-ईडीयु, दिनांक ०८.०४.२०२४.

प्रस्तावना:-

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, जालना येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नीत ५०० रुग्णखाटांचे रुग्णालय सुरु करण्यास शासनाने संदर्भ क्र. २ वरील दिनांक १४.०७.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूरी प्रदान केली आहे. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, जालना येथे शैक्षणिक वर्ष २०२४-२५ मध्ये सदरचे महाविद्यालय कार्यान्वित करण्याच्या मानस आहे. सदर महाविद्यालय इमारतीचे बांधकाम पूर्ण होण्यास बराच कालावधी लागणार आहे. त्यामुळे उक्त महाविद्यालयाकरीता राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोगाच्या मानकांची पुर्तता होण्याच्या दृष्टीने वापरास तयार असलेली एक खाजगी इमारत शासकीय दराने भाडेतत्वावर घेण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

१. जालना येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नवनिर्मित शासकीय वैद्यकीय महाविद्यालय शैक्षणिक वर्ष २०२४-२५ मध्ये कार्यान्वित करण्यासाठी तसेच, राष्ट्रीय आयुर्विज्ञान आयोग यांच्या मानकांची पुर्तता होण्याच्या दृष्टीने मे. एचएमएस रिसर्च अॅड एज्युकेशन फाऊंडेशन (मे. ग्लोबल गुरुकुल स्कुल) यांची सर्वे. क्र. ३४५, रिंग रोड, ओव्हर ब्रीज, जालना येथील इमारत मोकळ्या जागेसह सार्वजनिक बांधकाम कार्यालयाकडून निश्चित केलेल्या प्रतिमाह रु.२२,३६,६००/- प्रमाणे एकूण रु. २,६८,३९,२००/-

(जी.एस.टी कर व स्थानिक स्वराज्य संस्थांच्या कराव्यतिरिक्त) (रु. दोन कोटी अडोसष्ठ लाख एकोणचाळीस हजार दोनशे फक्त) इतके वार्षिक भाडे अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर भाडेकरार इमारत महाविद्यालयास उपलब्ध करुन दिलेल्या दिनांकापासून अंमलात येईल व त्याची मुदत ०१ वर्ष कालावधी व त्यानंतर महाविद्यालयाच्या आवश्यकतेप्रमाणे जोपर्यंत शासकीय इमारत उपलब्ध होत नाही तो पर्यंत टप्प्याटप्प्याने मुदतवाढ शासन मान्यतेने करता येईल.

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -१, अनुक्रमांक-१० अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. याबाबतचा सामंजस्य करार अधिष्ठाता यांनी संस्थास्तरावर करावा.

५. यावर होणारा खर्च शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, जालना या संस्थेच्या (२२१० K१३२) लेखाशिर्षांतर्गत (१४) भाडेपट्टी व कर या उद्दिष्टांतर्गत सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६२५१२३८५४३८१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO GIRDHARI JOGDAND

Digitally signed by MAHADEO GIRDHARI JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO GIRDHARI JOGDAND
Date: 2024.06.25 15:03:40 +05'30'

**(म.गि.जोगदंड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखाकार - १/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र,मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
३. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, जालना.
४. जिल्हा कोषागार अधिकारी, जालना.
५. मे. एचएमएस रिसर्च ॲड एज्युकेशन फाऊंडेशन (मे. ग्लोबल गुरुकुल स्कुल), जालना.
६. निवडनस्ती (प्रशा-२).